परवानाधारक सावकारांकडून विदर्भ मराठवाड्यातील शेतक-यांनी घेतलेले कर्ज अदा करण्यासाठी निधी वितरीत करण्यास मान्यता देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**

**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः एमएलए-१६१५/प्र.क्र.७९/७-स,**

हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग

मंत्रालय, मुंबई ०३२.

तारीख: ३ जून,२०१५

वाचा -

**१) शासन निर्णय क्रमांकः एमएलल-१०१५/प्र.क्र.२५/७-स, दि. १० एप्रिल, २०१५**

प्रस्तावना -

विदर्भ व मराठवाडयातील शेतकऱ्यांनी परवानाधारक सावकारांकडून घेतलेले एकूण रु. १७१.३० कोटी एवढे कर्ज शासनामार्फत संबंधित सावकारास अदा करुन शेतकऱ्यांना कर्जमुक्त करण्यास वाचा क्र. १ येथील शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आली आहे.

विदर्भ व मराठवाड्यातील शेतक-यांनी परवानाधारक सावकारांकडून घेतलेल्या कर्जाची पतरतफेड करण्यासाठी सन २०१५-१६ च्या अर्थसंकल्पात रु.१७१.३० कोटी इतक्या रकमेची तरतुद करण्यात आली असून, सदर तरतुदीमधून सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, पुणे कार्यालयास सद्यस्थितीत रु. ५० कोटी इतका निधी उपलब्ध करुन देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय-

विदर्भ व मराठवाड्यातील शेतक-यांनी परवानाधारक सावकारांकडून घेतलेल्या कर्जाची पतरतफेड करण्यासाठी सन २०१५-१६ च्या अर्थसंकल्पीय अंदाजात रु. १७१.३० कोटीची तरतुद करण्यात आली आहे. सदर तरतूदीमधुन रु. ५० कोटी इतका निधी वितरीत करण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

सदर खर्च हा सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी या विभागाच्या मागणी क्र. व्ही-२, २४२५, सहकार (००)(०१) परवानाधारक सावकाराकडून शेतक-यांनी घेतलेल्या कर्जाची परतफेड (योजनेतर) (दत्तमत) ३३ अर्थसहाय्य (२४२५ २४४४) या लेखाशीर्षाखाली सन २०१५-१६ या वर्षासाठी मंजूर असलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

उक्त निधी वितरीत करतांना विभागाच्या वाचा क्र. १ येथील शासन निर्णयात नमूद कार्यपध्दतीचा अवलंब करुन त्यानुसार अटी/शर्तीची तंतोतंत पुर्तता झाल्यानंतरच सहकार आयुक्त निबंधक, सहकारी संस्था यांनी अनुदानाचे वाटप करावे. तसेच सदर योजनेची काटेकोर अंमलबजावणी करण्याच्या दृष्टीने त्यांनी योजनेचे संनियंत्रण करावे. सदर निधी मधुन वितरीत करण्यात आलेल्या रकमेबाबतचा जिल्हा निहाय तपशीलवार अहवाल प्रतीमहा शासनास सादर करावा.

सदरचा शासन निर्णय वित्त विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्रमांक:- २०९/१५/व्यय-२, दिनांक ३०.३.२०१५ अन्वये मिळालेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०५२८१३३४२६३७०२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Santosh Arun Patil

Digitally signed by Santosh Arun Patil
DN: CN = Santosh Arun Patil, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Officer On Special Duty
Date: 2015.06.08 10:58:40 +05'30'

**संतोष पाटील**
विशेष कार्य अधिकारी

**प्रत,**

१. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव.
२. मा. मंत्री (सहकार) यांचे खाजगी सचिव.
३. मा. राज्यमंत्री (सहकार) यांचे खाजगी सचिव.
४. मा. मुख्य सचिव यांचे उप सचिव
५. मा. अप्पर मुख्य सचिव (वित्त), वित्त विभाग
६. मा. प्रधान सचिव (सहकार) सहकार, पण न व वस्त्रोद्योग विभाग
७. सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे
८. विभागीय सहनिबंधक, सहकारी संस्था (नागपूर, औरंगाबाद व अमरावती)
९. नागपूर, औरंगाबाद व अमरावती विभागातील सर्व उप / सहाय्यक निबंधक, सहकारी संस्था
१०.महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र राज्य, मुंबई
११.महालेखापाल (लेखा व परिक्षा) महाराष्ट्र राज्य, मुंबई
१२.महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र राज्य, औरंगाबाद
१३.महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र राज्य, अमरावती
१४.महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र राज्य, नागपूर
१५.महालेखापाल (लेखा व परिक्षा) महाराष्ट्र राज्य, नागपूर
१६.संचालक लेखा व कोषागार, महाराष्ट्र राज्य, मुंबई
१७.नागपूर, औरंगाबाद व अमरावती विभागातील सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
१८. निवड नस्ती